महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन अधिसूचना, क्रमांक : वेपुर १२०९/सुधारणा-५/प्र.क्र.१३९/सेवा-९
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - २८ ऑगस्ट, २००९

पहा :- शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक : वेपुर-१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९,
दिनांक २२ एप्रिल, २००९

## शासन अधिसूचना

भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकान्वये महाराष्ट्राच्या राज्यपालांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक : वेपुर १२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दिनांक २२ एप्रिल, २००९ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ च्या सोबत जोडलेल्या अधिसूचनेच्या अनुसूचीतील पृ.क्र.४४५ वरील महिला व बाल विकास विभागांतर्गत आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा योजना कार्यालयांतर्गत अ.क्र.१६ येथील नोंदीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| अनु-सूचितील अनुक्रमांक | पदनाम | विद्यमान वेतनश्रेणी | सुधारित वेतन संरचना | |
|---|---|---|---|---|
| | | | वेतन बँड | ग्रेड वेतन |
| १ | २ | ३ | | |
| १६ | मुख्य सेविका / पर्यवेक्षिका | ४५०० - ७००० | ९३०० -३४८०० | ४,१०० |

२. या सुधारणेच्या परिणामी संबंधित कर्मचा-यांची दिनांक १.१.२००६ ते ३१ ऑगस्ट, २००९ या कालावधीत काल्पनिक वेतननिश्चिती करण्यात यावी व सुधारित वेतनाचा प्रत्यक्ष लाभ दिनांक १ सप्टेंबर २००९ पासून देण्यात यावा. तसेच या सुधारणेच्या परिणामस्वरूप दिनांक १.१.२००६ ते ३१ ऑगस्ट, २००९ या कालावधीतील वेतन व भत्यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

वेतननिश्चितीचा विकल्प या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्याआत देण्यात यावा.

३. सदर शासन अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आली असून तिचा सांकेतांक २००९०८२७१४०१३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि. म. म्हात्रे )
उप सचिव, वित्त विभाग.

प्रति,
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहायक
महिला व बाल विकास विभाग.
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, (सर्व)
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९